**महाराष्ट्र असोसिएशन ऑफ अँथ्रोपोलॉजिकल सायन्सेस, पुणे या स्वयंसेवी संस्थेस आरोग्य विषयक आदिवासी उत्थान कार्यक्रम टप्पा-२ राबविण्यासाठी अनुदान देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आविवि २०१४/प्र.क्र.२०/का-८**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१ ऑक्टोबर,२०१४.

**प्रस्तावना**

डॉ. आर.एस. आरोळे, कॉम्प्रेसिव्ह रुरल हेल्थ प्रोजेक्ट, जामखेड, जिल्हा - अहमदनगर आणि महाराष्ट्र असोसिएशन ऑफ अँथ्रोपोलॉजिकल सायन्सेस, पुणे या स्वयंसेवी संस्थेमार्फत आरोग्य विषयक आदिवासी उत्थान कार्यक्रम सन २००४ ते सन २०१३ या कालावधीत राबविण्यात आला होता. सदर कार्यक्रम महाराष्ट्रातील ठाणे, नंदुरबार, अमरावती, अहमदनगर, गडचिरोली, यवतमाळ आणि रायगड या ७ जिल्हयातील आदिवासी बहुल ९ तालुक्यात राबविण्यात आला आहे. आदिवासी समाजात आत्मविश्वास वाढविणे व त्यांची क्षमता विकसित करणे या दृष्टीकोनातून सदर कार्यक्रमांतर्गत आरोग्य, शिक्षण, उदरनिर्वाह, समुदाय विकास, अधिकाराविषयी जागृती, प्रशिक्षण व संस्कृतिची ओळख या घटक कार्यक्रमाचा समावेश होता. सन २०१३-१४ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र असोसिएशन ऑफ अँथ्रोपोलॉजिकल सायन्सेस, पुणे या स्वयंसेवी संस्थेने राज्यातील पालघर, नंदुरबार, अमरावती, अहमदनगर, गडचिरोली, यवतमाळ आणि रायगड या ७ जिल्हयात आदिवासी उत्थान कार्यक्रम टप्पा -२ राबविण्याकरिता रु. १० कोटीचा (३ वर्षाकरिता) प्रस्ताव शासनास सादर केला. आदिवासी उत्थान कार्यक्रमाची फलनिष्पत्ती पहाता आदिवासी भागात सार्वजनिक आरोग्य व महिला बाल विकास विभागाच्या सहभागाने ३ वर्षाच्या आतील आदिवासी बालकांच्या कुपोषणाचे प्रमाण कमी करण्याच्या प्रमुख उददेशाने पुन्हा त्याच कार्यक्षेत्रात आरोग्य विषयक आदिवासी उत्थान कार्यक्रम टप्पा-२ राबविण्याबाबतच्या सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

आदिवासी मानव संसाधन विकास,आदिवासी समुदायाचा कौशल्य व क्षमता विकास ,आरोग्य व पोषण व विकासातील एकात्मिक सामूहिक कृती कार्यक्रमाचे प्रतिमान, सुदृढ समाजाच्या निर्मितीसाठी एकात्मिक आदिवासी गाव विकासाचे प्रतिमान,संशोधन, माहितीचे संकलन तसेच आरोग्य व पोषण विषयक विकास निर्देशांक, संनियंत्रण व मुल्यमापन तसेच दस्तऐवजीकरण व प्रसार इत्यादी कार्यक्रम राबविता यावेत म्हणून महाराष्ट्र असोसिएशन ऑफ अँथ्रोपोलॉजिकल सायन्सेस, पुणे या स्वयंसेवी संस्थेस राज्यातील ठाणे, नंदुरबार, अमरावती, अहमदनगर, गडचिरोली, यवतमाळ आणि रायगड या ७ जिल्हयांत रुपये १०.०० कोटी इतक्या रक्कमेचा आरोग्यविषयक आदिवासी उत्थान कार्यक्रम टप्पा -२ हा कार्यक्रम ३ वर्षाकरिता राबविण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. १) सदरहू कार्यक्रम ज्या भागात राबवायचा आहे त्याची माहिती परिशिष्ट “अ” मध्ये दर्शविली आहे.

२) या कार्यक्रमाचे उद्दीष्ट व राबविण्यात येणारे घटक कार्यक्रम यांची माहिती परिशिष्ट “ब” मध्ये दर्शविण्यात आली आहे.

३) या कार्यक्रमाकरिता ३ वर्षात जो निधी उपलब्ध करण्यात आला आहे त्याची माहिती परिशिष्ट "क " मध्ये दर्शविण्यात आली आहे.

४. या योजनेचा आढावा / मुल्यमापनाचे काम राज्य व प्रकल्प स्तरावरुन करण्यात येईल. याकरिता खालीलप्रमाणे समित्यांची स्थापना करण्यात येत आहे. सदर समित्यांची रचना खालील प्रमाणे राहील.

४.१ **क्षेत्रीय समन्वय समिती** (प्रत्येक कार्यक्षेत्राची १) :- या समितीची रचना खालीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| अपर आयुक्त, आदिवासी विकास (संबंधित) | - | अध्यक्ष |
| प्रकल्प अधिकारी,ए.आ.वि.प्र. (संबंधित) | - | उपाध्यक्ष |
| गट विकास अधिकारी | - | सदस्य |
| सभापती, पंचायत समिती | - | सदस्य |
| सभापती,महिला व बालकल्याण, जिल्हा परिषद | - | सदस्य |
| बालविकास प्रकल्प अधिकारी, ए.बा.वि.प्र. | - | सदस्य |
| तालुका आरोग्य अधिकारी /वैदयकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र. | - | सदस्य |
| आदिवासी उत्थान कार्यक्रम, मध्यवर्ती कार्यालय प्रतिनिधी | - | सदस्य |
| तालुका समन्वयक, आदिवासी उत्थान कार्यक्रम | - | सदस्य सचिव |

**क्षेत्रीय समन्वय समितीची बैठक ३ महिन्यातून एकदा कार्यक्षेत्रांतर्गत होईल.**

४.२ **राज्यस्तरीय समन्वय समिती** :- या समितीची रचना खालीलप्रमाणे राहील

| | | |
|---|---|---|
| आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | - | अध्यक |
| आयुक्त, महिला व बाल विकास,पुणे | - | सदस्य |
| अतिरिक्त संचालक, आरोग्य व कुटुंब कल्याण, पुणे | - | सदस्य |
| अपर आयुक्त, आदिवासी विकास, (संबंधित) | - | सदस्य |
| प्रकल्प अधिकारी,ए.आ.वि.प्र. (संबंधित) | - | सदस्य |
| अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र मानव विज्ञान परिषद | - | सदस्य |
| कार्यक्रम व प्रशिक्षण अधिकारी, उत्थान कार्यक्रम | - | सदस्य |
| संशोधन व दस्तऐवजीकरण अधिकारी, उत्थान कार्यक्रम | - | सदस्य |
| संनियंत्रण व मुल्यमापन अधिकारी, उत्थान कार्यक्रम | - | सदस्य सचिव |

**राज्यस्तरीय समन्वय समितीची बैठक ४ महिन्यातून एकदा होईल**

४.३ **उच्चस्तरीय समन्वय समिती** :- या समितीची रचना खालीलप्रमाणे राहील

| | | |
|---|---|---|
| प्रधान सचिव/सचिव, आदिवासी विकास विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव /सचिव, महिला व बाल विकास विभाग | - | अध्यक्ष |
| प्रधान सचिव /सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव/महासंचालक, राजमाता जिजाऊ पोषण मिशन | - | निमंत्रित |
| आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | - | सदस्य |
| प्रा. रा.के. मुटाटकर, मानवशास्त्रज्ञ | - | निमंत्रित |

अध्यक्ष, महाराष्ट्र मानव विज्ञान परिषद - सदस्य
कार्यक्रम व प्रशिक्षण अधिकारी, उत्थान कार्यक्रम -सदस्य सचिव

**उच्चस्तरीय समन्वय समितीची बैठक ९ महिन्यांतून एकदा होईल.**

**उपरोक्त समित्यांची बैठक विहित कालावधीत आयोजित करण्याची व सदर बैठकीचे इतिवृत्त प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग व आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडे सादर करण्याची जबाबदारी सदस्य सचिव यांची राहील.**

४.४ **लाभार्थ्यांची निवड** : योजनेची अंमलबजावणी करणारी संस्था क्षेत्रिय समन्वय समितीशी सल्लामसलत करुन लाभार्थ्यांची व गावांची निवड करतील.

**५.** या कार्यक्रमाकरिता सन २०१४-१५ ते २०१६-१७ या ३ आर्थिक वर्षाकरीता रुपये ९,९९,७१,७४०/-(रुपये नऊ कोटी नव्याणव लाख एक्काहत्तर हजार सातशे चाळीस फक्त) उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. सदर योजनेकरिताचा खर्च "मागणी क्र. टी-५, २२२५-अनु.जाती, अनु.जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०२ अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६ -जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (१२) आदिवासी जिल्हयात आरोग्य कार्यक्रमाची अंमलबजावणी (२२२५ ३५८३), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर ), ३६ सहायक अनुदान( वेतन )" या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक व संबंधीत स्वयंसेवी संस्था यांच्यात होणा-या करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार या कार्यक्रमाची अंमलबजावधी संबंधीत स्वयंसेवी संस्था व आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक संयुक्तपणे करतील. करार झाल्यानंतर कार्यक्रम राबविणा-या संस्थेच्या नांवाने योग्य हप्त्यामध्ये निधी धनादेशाद्वारे अदा करण्यात यावा. सदर कार्यक्रमाचे संनियंत्रण व कार्यक्रम राबविण्याबाबतचा करार, अटी व शर्ती विहित करण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे राहील. कार्यक्रमाकरिता संबंधीत संस्थेने राष्ट्रीयकृत बँकेकडे स्वतंत्र खाते उघडावे व त्यातूनच निधी खर्च करण्यात यावा.

७. सदर कार्यक्रमाचे मुल्यमापन प्रथम वर्षअखेरीस आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेमार्फत करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२११२११०९६९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2014.10.21 16:22:07 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
शासनाचे उपसचिव

प्रत,

१) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक

२) सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास,
३) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
४) सह संचालक, माहिती व प्रसिध्दी संचालनालय, मुंबई.
५) सह संचालक, आरोग्य संचालनालय, मुंबई.
६) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व आदिवासी जिल्हे)
८) जिल्हा कोषगार अधिकारी ( संबंधित जिल्हे)
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई / नागपूर.
१०) महालेखापाल (लेखापरिक्षा ), मुंबई / नागपूर.
११) वित्त विभाग (व्यय -१४), मंत्रालय, मुंबई -३२
१२) सर्व मा. विधानसभा /विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ.
१३) मा. मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव.
१४) मा.राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव,
१५) सर्व सहसचिव /उपसचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१६) सर्व अवर सचिव /कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१७) अध्यक्ष, महाराष्ट्र असोसिएशन ऑफ अँथ्रोपोलॉजिकल सायन्सेस, पुणे.
१८) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, जव्हार, मोखाडा, जि.ठाणे / अक्कलकुवा, धडगांव, जि.नंदुरबार / धारणी, जि.अमरावती / अकोले, जि. अहमदनगर /एटापल्ली, जि.गडचिरोली / झारी जमणी, जि. यवतमाळ कर्जत, जि.रायगड
१९) निवडनस्ती (कार्यासन ८)

## परिशिष्ट " अ "

( आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : आविवि २०१४/प्र.क्र.२०/का-८, दिनांक : २१ ऑक्टोबर, २०१४.)

### आदिवासी उत्थान कार्यक्रम टप्पा-२ ज्या क्षेत्रात राबवायचा त्या क्षेत्राची माहिती
### कार्यक्रमाचे क्षेत्र / लाभक्षेत्र

| अ.क्र. | जिल्हयाचे नांव | तालुक्याचे नांव | कार्यक्रमांतर्गत गांवे | पाडे /वाडया | ग्रामपंचायती | लोकसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | ठाणे | १)जव्हार | १९ | ३१ | १० | २०२१७ |
| | | २)मोखाडा | १४ | ५० | ०५ | २०५३५ |
| २. | नंदुरबार | १)अक्कलकुवा | ११ | ४४ | ०३ | १९८९० |
| | | २)धडगांव | ३१ | १०० | ०५ | २२१८९ |
| ३. | अमरावती | धारणी | २५ | --- | १४ | २१७६३ |
| ४. | अहमदनगर | अकोले | २७ | २८ | १४ | २०२२० |
| ५. | गडचिरोली | एटापल्ली | ३७ | --- | ०९ | १९९९८ |
| ६. | यवतमाळ | झरीजामणी | ३२ | २३ | १५ | १९२२९ |
| ७. | रायगड | कर्जत | -- | ६४ | १४ | २०७५२ |
| **एकूण** | | | १९६ | ३४० | ८९ | १,८५,४९३ |

## परिशिष्ट " ब "

**( आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : आविवि २०१४/प्र.क्र.२०/का-८, दिनांक : २१ ऑक्टोबर, २०१४. )**

**कार्यक्रमाची उद्दिष्टे :-**

१) आदिवासी युवक कार्यकर्त्यांच्या माध्यमातून आदिवासी जनतेचे सबलीकरण करणे.

२) अंगणवाडी,आश्रमशाळा, व आदिवासी समूह संस्थांच्या माध्यमातून आरोग्य, पोषण व विकास क्षेत्रातील एकात्मिक सामूहीक कृती कार्यक्रमांचे प्रतिमान विकसित करणे.

३) आदिवासी विकास योजना व आदिवासी गांव पाडा पातळीवरील समूह संस्थांच्याद्वारे (जसे महिलामंडळ, युवकमंडळ, पंचायत राज संस्था इ.) एकात्मिक लोकसहभागीय विकास साधणे

४) आदिवासी अस्मिता,संस्कृती व प्रथांवर आधारीत संशोधन करणे तसेच माहिती संकलन व आदिवासी विकास निर्देशांक तयार करणे.

५) प्रकल्पांतर्गत चालू असलेल्या कार्यक्रमाचे व प्रकल्पाचे संनियंत्रण व मुल्यमापन.

६) प्रकल्पातील कार्यक्रमाचे प्रलेखन व प्रसार.

**प्रकल्पात समाविष्ट असलेले घटक :-**

| अ.क्र. | घटक | प्रकल्पांतर्गत घेण्यात येणार कार्यक्रम |
|---|---|---|
| १. | आदिवासी मानव संसाधन विकास | २०० आदिवासी सामजिक कार्यकर्ते, २०० आरोग्य कार्यकर्ते, २२५ आदिवासी समूह संस्थांचे प्रतिनिधी आणि ४५० आदिवासी ग्रामपंचायतींचे सदस्य असे एकूण १०७५ संसाधकांसाठी आरोग्य, पोषण व विकास विषयक प्रशिक्षण कार्यक्रमाचे आयोजन करणे |
| | आदिवासी समूह संस्था व त्यांच्या सदस्यांचा कौशल्य व क्षमता विकास | ४०५ समूह संस्थांच्या सदस्यांना आरोग्य, पोषण व विकास कार्यक्रमाचे प्रशिक्षण देऊन त्यांच्यात कौशल्य विकसित करणे |
| २. | आरोग्य,पोषण व विकासातील एकात्मिक सामूहिक कृती कार्यक्रमाचे प्रतिमान | आरोग्य, पोषण व रचनात्मक कार्याच्या दृष्टीने २२५ समूह संस्थांच्या प्रतिनिधीना कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता प्रशिक्षित करणे. |
| | | ३ वर्षाच्या आतील एकूण ४०५० मुलांच्या वजनावर ३ वर्षे लक्ष केंद्रित करणे तसेच ३वर्षाच्या आतील ३६४५ मुलांना पोषणयुक्त सत्तू देणे, २५०० आदिवासी नवजात बालकांना झबले-टोपडे-दुपटे संच पुरविणे, १५०० स्तनदा मातांना आयुर्वेदिक औषधेमिश्रित सत्तू देणे, ४०० आदिवासी कार्यकत्यांना ॲलोपॅथि व आयुर्वेदिक औषधपेटी उपलब्ध करुन देणे, १२० दाई आणि ९० वैदुंमार्फत सुरक्षित मातृत्व कार्यक्रमांतर्गत |

| | | |
|---|---|---|
| | | तसेच आरोग्य विषयक कार्यान्वित असलेल्या योजनांचा लाभ आदिवासी लाभार्थ्यांना मिळवून देण्यासाठी त्यांना प्रशिक्षित करणे |
| | | कार्यक्रमाच्या पहिल्या वर्षाच्या अखेरीस कार्यक्षेत्रांतर्गत ३ वर्षाच्या आतील अंदाजे ६५ % , द्वितीय वर्ष अखेरीस ७० % तर तृतीय वर्षाच्या अखेरीस ७५ % आदिवासी बालके साधारण पोषण श्रेणीमध्ये असतील. |
| | | ८१० आदिवासी विद्यार्थ्यांना जीवन-कौशल्य शिक्षण |
| | | २७०० आदिवासी किशोरवयीन विद्यार्थी-विद्यार्थींनींची आरोग्य तपासणी, आरोग्य शिक्षण व स्वच्छता इ. उपक्रम स्थानिक प्राथमिक आरोग्य केंद्रांच्या सहाय्याने राबविणे. तसेच राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत लोह व फोलिक ॲसिड गोळया आणि जीवनसक्तयुक्त पोषणतत्वांचा पुरवठा सुनिश्चित करणे . हिमोग्लोबिनच्या प्रमाणावर नियमित देखरेख ठेवणे. |
| | | गरोदर मातांची त्वरीत नोंदणी व लसीकरण तसेच ३ वर्षाच्या आतील आदिवासी बालकांचे लसीकरण यासंबंधी पाठपुरावा करणे. |
| | | सुरक्षित प्रसूति कार्यक्रमात आदिवासी समूह संस्थांचा व दाईंचा सहभाग वाढविणे, अति जोखमीच्या मातांना त्वरित आरोग्य केंद्रात दाखल करण्यासाठी संदर्भ सेवा उपलब्ध करुन देणे.<br>राष्ट्रीय बाल स्वास्थ्य कार्यक्रमात आदिवासी समाजाचा व समूह संस्थांचा सक्रिय सहभाग वाढविण्याचा प्रयत्न करणे. |
| ३. | एकात्मिक आदिवासी गांव विकासाचे प्रतिमान | आदिवासी गांव / पाडा पातळीवरील समूह संस्था व आदिवासी विकास यांजनांच्या माध्यमातून ७ आदिवासी गांवे आदिवासी पाडयांसह विकसित करण्यावर भर देणे.<br>पेसा कायदयाअंतर्गत ग्राम सभांच्या माध्यमातून मत्स्यतळी मिळवून देण्यासाठी तसेच वनहक्क कायदयाअंतर्गत १०० हेक्टर वनक्षेत्रातील वनहक्क मिळवून देण्यासाठी आदिवासी समूह संस्थांना मार्गदर्शन व सहाय्य करणे. |

| | | |
|---|---|---|
| ४. | संशोधन, माहितीचे संकलन तसेच आरोग्य व पोषण विषयक विकास निर्देशांक | प्रस्तावित लोकसंख्या / जमाती, व संस्था यांचे माहिती अहवाल, कार्यक्षेत्रातील आदिवासी विकास योजनांच्या लाभार्थ्यांच्या माहितीचे संकलन, प्रस्तावित लोकसंख्या व पायाभूत सर्वेक्षण करुन आदिवासी विकासांचा निर्देशांक काढणे, आदिवासी आरोग्य, संस्कृती,लिंगभाव, विकासाची प्रक्रिया व परिणाम यांचा मानवशास्त्रीय अभ्यास करुन जमातीनिहाय प्रबंध तयार करणे, १२ आदिवासी जमातींमधील माता व बाल आरोग्याचा मानवशास्त्रीय अभ्यास करणे. |
| ५. | संनियंत्रण व मुल्यमापन | कार्यक्रमाचा आढावा व मुल्यमापन संस्थेची स्वतंत्र यंत्रणा व समित्यांमार्फत करण्यात येईल. तसेच ९ कार्यक्षेत्रातील कामांचा आढावा अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत दर ३ महिन्यांनी तर आयुक्त, आदिवासी विकास यांचेमार्फत दर ४ महिन्यांनी तर प्रधान सचिव,आदिवासी विकास यांमार्फत दर ९ महिन्यांनी घेण्यात येईल. |
| ६. | दस्तऐवजीकरण (प्रलेखन)व प्रसार | प्रकल्पाच्या सुरुवातीला लोकसहभागातून पायाभूत सर्वेक्षण व  प्रकल्पाच्या अखेरीस अन्य संस्थेकडून कार्यक्रमाचे मुल्यमापन. |

# परिशिष्ट " क "

(आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : आविवि २०१४/प्र.क्र.२०/का-८,
दिनांक : २१ ऑक्टोबर, २०१४.)

## आदिवासी उत्थान कार्यक्रम टप्पा-२

## ३ वर्षाकरिता आवश्यक निधीचा तपशील

| | तपशील | प्रथम वर्ष | द्वितीय वर्ष | तृतीय वर्ष | एकूण खर्च |
|---|---|---|---|---|---|
| भाग १ | आवर्ती खर्च | | | | |
| १) | मध्यवर्ती कार्यालय कर्मचारी वेतन | ३३,४८,०००/- | ३६,८२,८००/- | ४०,५१,०८०/- | १,१०,८१,८८०/- |
| २) | प्रत्यक्ष कृती कार्यक्रम खर्च : तालुका प्रकल्प समन्वयक ९ कार्यक्षेत्रा कर्मचारी,सामाजिक कार्यकर्ते मानधन,पायाभूत सर्वेक्षण,माहिती संकलन व आदिवासी विकास निर्देशांक,आश्रमशाळा सबलीकरण,आरोग्य आणि पोषण विषयक कृती कार्यक्रम, प्रशिक्षण आणि कौशल्य विकास | २,०५,४२,२५०/- | २,५१,३६,६५०/- | २,०४,५१,७२३/- | ६,६१,३०,६२३/- |
| ३) | संनियंत्रण व मुल्यमापन | २३,३७,०००/- | २३,०३,४००/- | ३३,४३,७४०/- | ७९,८४,१४०/- |
| ४) | दस्तऐवजीकरण व प्रसार | ४,५०,०००/- | ६,४५,०००/- | ७,०९,०००/- | १८,०४,५००/- |
| ५) | कन्झ्युमेबल्स | १९,९०,०००/- | -- | -- | १९,९०,०००/- |
| ६) | इतर खर्च | १९,५४,३२०/- | २१,४९,७५२/- | २३,६४,७२७/- | ६४,६८,७९९/- |
| | **एकूण आवर्ती खर्च** | **३,०६,२१,५७०/-** | **३,३९,१७,६०२/-** | **३,०९,२०,७७०/-** | **९,५४,५९,९४२/-** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भाग २** | अनावर्ती खर्च | १६,००,०००/- | -- | -- | १६,००,०००/- |
| **भाग ३** | संस्था वरकड खर्च | ९,६६,६४७/- | १०,१७,५२८/- | ९,२७,६२३/- | २९,११,७९८/- |
| | **एकूण खर्च** | **३,३१,८८,२१७/-** | **३,४९,३५,१३०/-** | **३,१८,४८,३९३/-** | **९,९९,७१,७४०/-** |

<u>आदिवासी उत्थान कार्यक्रम टप्पा-२</u>

<u>३ वर्षाकरिता आवश्यक निधीचा संक्षिप्त तपशील</u>

| बाब | प्रथम वर्ष | द्वितीय वर्ष | तृतीय वर्ष | एकूण खर्च |
|---|---|---|---|---|
| **भाग १** | ३,०६,२१,५७०/- | ३,३९,१७,६०२/- | ३,०९,२०,७७०/- | ९,५४,५९,९४२/- |
| **भाग २** | १६,००,०००/- | -- | -- | १६,००,०००/- |
| **भाग ३** | ९,६६,६४७/- | १०,१७,५२८/- | ९,२७,६२३/- | २९,११,७९८/- |
| **एकूण खर्च** | **३,३१,८८,२१७/-** | **३,४९,३५,१३०/-** | **३,१८,४८,३९३/-** | **९,९९,७१,७४०/-** |